ई-निविदा प्रणाली अंतर्गत अल्प कालावधीची निविदा सूचना प्रसिद्ध करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

शासन आदेश क्रमांकः निविदा-२०२१/प्र.क्र.१३/बांध-४
५ वा मजला, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
तारीख : १२ जून, २०२५

वाचा :

१. **शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग क्रमांक :** सीएटी-२०१७/प्र. क्र.०८/इमा-२, दिनांक २७ सप्टेंबर, २०१७.
२. **शासन परिपत्रक, मुख्य सचिव कार्यालय, क्रमांकः** बीडीजी -२०२४/प्र.क्र.३८६/इमा-३, दिनांक २० जानेवारी, २०२५.
३. **शासन परिपत्रक, ग्राम विकास विभाग समक्रमांकः** दिनांक २१ मे, २०२५.
४. **मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे क्रमांक :** जिप/लेखा-६/१२०१/२०२५, दिनांक ०८ जून, २०२५.

**शासन आदेश :**

आगामी आषाढी एकादशीला कमी कालावधी असल्याने राज्यातील भाविक मोठ्या प्रमाणात पंढरपुर (जि. सोलापूर) या ठिकाणी वारी निमित्त येत असतात. त्या अनुषंगाने संदर्भ क्रमांक ३ येथील येथील शासन आदेशान्वये, ई - निविदा प्रणाली अंतर्गत अल्प कालावधीची निविदा सूचना प्रसिद्ध करण्याची मुदत सातारा, सोलापूर व पुणे या जिल्ह्याकरिता दिनांक १० जुलै, २०२५ पर्यंत वाढविण्यात आलेली आहे. तथापि, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे यांनी वाचा मधील अनुक्रमांक ४ येथील पत्रान्वये, संत ज्ञानेश्वर महाराज पालखी मार्गावरील मौजे वाल्हा सुकाळवाडी येथील पर्यायी रस्त्याचे काम तातडीने करणे आवश्यक आहे. सदरचा मार्ग हा वाहतूक करतेवेळी कोंडी होऊ नये म्हणून वाहनांसाठी पर्यायी मार्ग म्हणून वापरला जातो. पालखी जात असताना पालखी प्रवासावेळी दोन ते तीन लाख भाविक व त्यांच्या सोबतची इतर अनुषंगिक वाहने इत्यादींची वाहतूक होत असते, त्यामुळे सदर जागेचे काँक्रीटीकरण करणे आवश्यक आहे. यास्तव, सातारा, सोलापूर, पुणे जिल्ह्यातील पालखी व आषाढी वारीशी संबंधित रस्ते व पालखी तळ विकसित करणे या कामांच्या निविदा प्रसिद्ध करून पालखीच्या आगमनापूर्वी ही कामे पूर्ण करणे आवश्यक आहे. त्यासाठी आषाढीवारी २०२५ साठी संदर्भ क्रमांक १ व २ येथील शासन निर्णयातील तरतुदी विचारात घेऊन निविदा प्रसिद्ध करणेचा कालावधी तीन दिवस ठेवण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**०२.** सदर आदेश मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे, सातारा, सोलापूर यांच्या अधिनस्त पालखीशी संबंधित रस्त्यांची कामे ही काँक्रीटीकरणाशी निगडीत असल्यास पालखी मार्ग सुस्थितीत असणे आवश्यक आहे. त्यास अनुसरुन संदर्भ क्र. १ व २ मधील तरतुदीच्या अनुषंगाने आषाढीवारीला अल्प कालावधी असल्याने पालखीशी संबंधित रस्त्यांची कामे व पालखीतळ विकसीत करणे ही कामे पालखी आगमनापुर्वी पूर्ण होण्याच्या दृष्टीने निविदा प्रसिद्ध करणेचा कालावधी तीन दिवसाचा मंजुर करण्यात येत आहे.

तथापि, उपरोक्त रस्त्यांची कामे ही काँक्रीटीकरणाशी निगडीत असून काँक्रीटीकरणाच्या कामास लागणारा किमान कालावधी व पालखी आगमनाचा वेळ विचारात घेता पालखी आगमनाच्या वेळी संबंधित पालखी मार्ग नियुक्त निविदाधारकाकडून सुस्थितीत ठेवून वारकरी भाविकांना अडचण निर्माण होणार नाही याची दक्षता संबंधित जिल्हा परिषदेने घेणे आवश्यक आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६१२१६५२५२३४२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASHANT VINAYAKRAO PATIL

Digitally signed by PRASHANT VINAYAKRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9524CAB2D5A858B4A01FF72F5CAE5FDDC4F8C964F3AFC6B6249294AD88EC870D, cn=PRASHANT VINAYAKRAO PATIL
Date: 2025.06.12 17:00:47 +05'30'

**(प्रशांत पाटील)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. विधानसभा व विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
२. प्रधान सचिव (ग्रा.वि. व पं.रा.), बांधकाम भवन, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव (मु.मं.ग्रा.स.यो.), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. विभागीय आयुक्त, पुणे.
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे, सातारा व सोलापूर.
७. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे, सातारा व सोलापूर.
८. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, पुणे विभाग, पुणे.
९. प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, पुणे, सातारा व सोलापूर.
१०. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे, सातारा व सोलापूर.

११.कार्यकारी अभियंता (बांधकाम, लघुपाटबंधारे, पाणी पुरवठा विभाग), जिल्हा परिषद, पुणे, सातारा व सोलापूर, सातारा व सोलापूर.

१२.कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, पुणे, सातारा व सोलापूर.

१३.ग्राम विकास विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व कार्यासने.

१४. निवडनस्ती कार्यासन बांधकाम-४, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.